**राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत मंजूर प्रकल्पांना सन २०१४-१५ करीता रु. ८२.५० कोटी निधी उपलब्ध करुन देण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : राकृवि ०६१४/प्र.क्र. ३५/राकृवियो कक्ष**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०४२
दिनांक : १९ जुलै, २०१४

वाचा :

**१) केंद्र शासनाचे पत्र क्र. ७-२/२०१४ आरकेव्हीवाय, दि. २६ मे, २०१४.**
**२) केंद्र शासनाचे पत्र क्र. ७-२/२०१४ आरकेव्हीवाय दि. २९ मे, २०१४.**
**३) केंद्र शासनाचे पत्र क्र. १-१५/२०१४ आरकेव्हीवाय, दि. २ जून, २०१४.**
**४) केंद्र शासनाचे पत्र क्र. ७-१/२०१४ आरकेव्हीवाय, दि. ४ जून, २०१४.**

प्रस्तावना :

११ व्या पंचवार्षिक योजनाकाळात कृषि व कृषि संलग्न क्षेत्राचा विकास दर ४% साध्य करण्याकरीता केंद्र शासनाने सन २००७-०८ या वर्षापासून राष्ट्रीय कृषि विकास योजना सुरु केलेली आहे. सदरची योजना १२ व्या पंचवार्षिक योजनेमध्येही राबविण्यात येत आहे. सदरहू योजनेचा केंद्र शासनाकडून उपलब्ध झालेला निधी जमा करण्याकरिता आयुक्त (कृषि) यांचे नावे नवीन स्वीय प्रपंजी लेखा खाते (Personal Ledger Account) उघडण्यात आलेले आहे.

केंद्र शासनाने राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत सन २०१४-१५ मध्ये राज्यास एकूण रु. १०१३.४९ कोटी निधी वितरित करण्यात येईल, असे संदर्भाधीन दि. २६ मे, २०१४ दि. २९ मे, २०१४ दि. ४ जून, २०१४ च्या पत्रान्वये कळविले आहे. तसेच केंद्र शासनाच्या संदर्भाधिन दि. २ जून, २०१४ रोजीच्या पत्रान्वये शासनास राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत राबवावयाच्या विशेष उप-योजना 'विदर्भ सघन सिंचन विकास कार्यक्रम आणि शहरी भागांकरीता भाजीपाला पुरवठा प्रकल्पाकरीता' एकूण रु.८२.५० कोटी निधी प्राप्त झाला असून सदर निधी मंजूर प्रकल्पांच्या अंमलबजावणीकरीता उपलब्ध करुन देण्याच्या अनुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

शासन निर्णय:

१. सन २०१४-१५ करीता राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत प्राप्त रु. ८२.५० कोटी (रुपये ब्याऐंशी कोटी पन्नास लाख फक्त) निधी या शासन निर्णयान्वये आयुक्त (कृषि), पुणे यांना अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीद्वारे पुढीलप्रमाणे उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

| अ.क्र. | योजनेचे नाव | निधी |
|---|---|---|
| १. | विदर्भ सघन सिंचन विकास कार्यक्रम (VIIDP) | रु .७५.०० कोटी |
| २. | शहरी भागांकरीता भाजीपाला पुरवठा प्रकल्प (VIUC) | रु .७.५० कोटी |
| | **एकूण** | रु .८२.५० कोटी |

उपरोक्त रक्कमेच्या कोषागारातून आहरण व वितरणाकरिता सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून, आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

२. सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे यांनी अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीद्वारे उपलब्ध झालेली रु. ८२.५० कोटी इतकी रक्कम कोषागारातून आहरित करुन आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या नावे उघडण्यात आलेल्या स्वीय प्रपंजी लेखा खाते (Personal Ledger Account) मध्ये जमा करावी व तसे शासनास अवगत करावे.

.३ आयुक्त (कृषि) यांनी सदर रु. ८२.५० कोटी निधी राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत मंजूर प्रकल्पांच्या अंमलबजावणीकरिता संबंधित विभाग/यंत्रणांच्या मागणी नुसार, तथापि राज्यस्तरीय प्रकल्प मंजुरी समितीने मंजूर केलेल्या वित्तीय मर्यादेमध्ये संबंधित विभाग/यंत्रणांना तात्काळ उपलब्ध करुन द्यावा.

४. राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत उपलब्ध झालेला रु.८२.५० (रुपये ब्याऐंशी कोटी पन्नास लाख फक्त) निधी खालील लेखाशिर्षांतर्गत सन २०१४-१५ करिता अर्थसंकल्पित तरतुदीतून खर्ची टाकावा.

मागणी क्रमांक डी -३

२४०१- पीक संवर्धन

(००) (८००) इतर खर्च

(००) (०९) राष्ट्रीय कृषि विकास योजना अंतर्गत अर्थसहाय्य

(२४०१ ८२३५) योजनांतर्गत/दत्तमत

पंचवार्षिक योजनांतर्गत योजना

(१०० टक्के केंद्र पुरस्कृत योजना)

३३-अर्थसहाय्य

५. सदर शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या निधी तात्काळ उपयोजन होण्याच्या हेतूनेच कोषागरातून आहरण करावा आणि सर्व अंमलबजावणी यंत्रणांनी/विभागांनी त्यांना प्राप्त होणा-या निधीचा तात्काळ विनियोग करावा. तसेच अंमलबजावणी यंत्रणांनी सदर निधी उपयोजनाविना बँक खात्यामध्ये जमा करुन ठेवू नये.

६. केंद्र शासनाने राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत सन २००७-०८ पासून सन २०१२-१३ पर्यंत विविध विभागांना वितरीत करण्यात आलेल्या निधीचे लेखापरीक्षण होऊन तसे प्रमाणित केल्यासच सदर योजनेंतर्गत उर्वरीत निधी दुसऱ्या टप्प्यामध्ये वितरीत करण्यात येईल, असे निर्देशीत केलेले आहे. यास्तव सन २००७-०८ ते सन २०१२-१३ या कालावधीत सर्व अंमलबजावणी यंत्रणांना/विभागांना वितरीत करण्यात आलेल्या निधीचे लेखापरीक्षण होऊन लेखा आक्षेपांची पूर्तता केली असली तरच संबंधित यंत्रणांना दुसऱ्या टप्प्यातील निधी वितरीत करण्यात येईल. सबब, सर्व अंमलबजावणी

यंत्रणांनी/विभागांनी त्यांना सन २००७-०८ ते सन २०१२-१३ या कालावधीत वितरित करण्यात आलेल्या निधीचे लेखापरिक्षण झाल्याचे प्रमाणित करावे.

.७ सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या मान्यतेने आणि वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्र. २२८/१४/व्यय-१, दि. १५ जुलै, २०१४ अन्वये प्राप्त मान्यतेनूसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०७२११६२०४९२४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shrikant Chandrakant Andge

Digitally signed by Shrikant Chandrakant Andge
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agriculture and adf, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Shrikant Chandrakant Andge
Date: 2014.07.21 16:19:51 +05'30'

**(श्रीकांत चं. आंडगे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
२. अपर मुख्य सचिव (कृषि व पणन), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव/सचिव (वित्त/जलसंधारण/वस्त्रोद्योग/पदुम/सहकार), मंत्रालय, मुंबई.
५. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. आयुक्त (पशुसंवर्धन), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, औंध, पुणे.
७. आयुक्त (मत्स्यव्यवसाय), मत्स्यव्यवसाय आयुक्तालय, तारापोरवाला मत्स्यालय, मुंबई.
८. आयुक्त (दुग्धव्यवसाय), दुग्धव्यवसाय आयुक्तालय, वरळी, मुंबई
९. आयुक्त (सहकार), साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे ४११ ००५.
१०.आयुक्त (साखर), साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे ४११ ००५.
११.महासंचालक, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, १३२/ब, भांबुर्डा, भोसलेनगर, पुणे ०० ४११७.
१२.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ मर्यादित, महाबीज भवन, कृषिनगर, अकोला ४४४ १०४.
१३.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि उद्योग विकास महामंडळ, कृषि उद्योग भवन, दिनकरराव देसाई मार्ग, आरे दुध वसाहत, गोरेगाव (पूर्व), मुंबई
१४.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ, गुलटेकडी, पुणे ४११ ०३७.
१५.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, गुलटेकडी, पुणे ४११ ०३७.
१६.संचालक (रेशीम), रेशीम संचलनालय, महा.राज्य, प्रशासकीय इमारत क्र.२,बी विंग, ६ वा माळा, विभागीय आयुक्त कार्यालय परिसर, सिव्हील लाईन्स, नागपूर - ४४०००१

१७.मुख्य अभियंता, लघुसिंचन (स्थानिक स्तर), महाराष्ट्र राज्य, बंगला नं. १२, जैन रस्ता, येरवडा पुणे ४११ ००६.
१८. संचालक (कृषि प्रक्रिया व नियोजन), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१९.उप सचिव )पणन(, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई३२ -
२०.सर्व उपसचिव, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
२१.महालेखाकार ( स्थानिक निकाय लेखा परिक्षा व लेखा), मुंबई.
२२.महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
२३.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
२४.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२५.निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
२६.जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
२७.सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२८. वित्त विभाग (कार्या. व्यय-१/अर्थसंकल्प - १४), मंत्रालय, मुंबई
२९.निवड नस्ती.